**जलसंपदा प्रकल्पातून घरगुती (पिण्याचे पाणी) प्रयोजनासाठीच्या राष्ट्रीय ग्रामीण पेयजल योजना खेड ता.इगतपुरी,जि.नाशिक या करिता बिगर सिंचन पाणी आरक्षणाच्या प्रस्तावास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः २०१५/(३४९/१५)/सिं.व्य.(धो)**
मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय,मुंबई ४०००३२
तारीख: २७/१०/२०१५

वाचा -

१) जलसंपदा विभाग, शासन निर्णय क्रमांक संकीर्ण १००१/ (१५४/०१) सिंव्य(धोरण) दिनांक २१ जानेवारी २००३.
२) महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण अधिनियम, २००५ यात सुधारणा करण्याकरिता अधिनियम दि.२२ एप्रिल,२०११.
३) शासन निर्णय क्रमांकः . संकिर्ण २०१३/(४६०/१३)/सिंव्य (धोरण) दि. २८/८/२०१४
४) शासन निर्णय क्रमांकः शासन निर्णय क्र. संकिर्ण २०१३/(४१५/१३)/सिंव्य (धोरण) दि. १६/८/२०१४

**प्रस्तावना**

१.० शासनाच्या पूर्वीच्या धोरणानुसार, पिण्याच्या पाण्यासहित सर्व प्रकारच्या बिगरसिंचन प्रयोजनासाठी उदा. उद्योग, औष्णिक विद्युत प्रकल्प, अन्य सिंचनेतर संस्था इ., यांना पाणीआरक्षण द्यावयाचे जे प्रस्ताव जलसंपदा विभागाकडे प्राप्त होतात, त्यातील पाण्याचे आरक्षण हे जलसंपदा विभागाच्या प्रकल्पांच्या जलाशयातील उपलब्ध पाणीसाठयाच्या १५ टक्क्यांपेक्षा कमी असल्यास, त्यास संबंधित मुख्य अभियंता तसेच हे प्रमाण १५ टक्के ते २५ टक्के असे असल्यास, त्यास मंत्रालयीन आंतर विभागीय सचिवस्तरीय समितीकडून मान्यता देण्यात येत होती. त्याचप्रमाणे हे प्रमाण २५ टक्क्यांपेक्षा जास्त असल्यास, त्यास मा. मंत्रीमंडळाची उपसमिती असलेल्या, मा. मंत्री, जलसंपदा (कृखोपाम वगळून) यांच्या अध्यक्षतेखालील मा. मंत्री उच्चाधिकार समितीकडून मान्यता देण्यात येत होती.

२.० महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण (सुधारणा व पुढे चालू ठेवणे) अधिनियम, २०११ यातील कलम ५ मधील १६(क) नुसार जलसंपत्ती प्रकल्पांमधील पाण्याचे क्षेत्रीय वाटप राज्य मंत्रीमंडळाकडून केले जाईल अशी तरतूद करण्यात आली आहे. परंतु दि. २८.८.२०१४ रोजी च्या शासन निर्णयान्वये जलसंपदा विभागाच्या प्रकल्पातून जिल्हापरिषदा, नगरपंचायती, नगरपालिका, नगरपरिषदा, ग्रामपंचायती, आणि कटक मंडळे (Cantonment Board) यांनी पिण्यासाठी पाणी मागणी केलेल्या नळ पाणी पुरवठा योजनांबाबतचे बिगर सिंचन पाणी आरक्षण प्रस्ताव मा.मंत्रीमंडळा समोर मान्यतेस्तव सादर करण्याऐवजी त्यास मा.मंत्री, जलसंपदा विभाग यांच्या स्तरावरुनच मान्यता देण्यात यावी. तथापि, महानगरपालीका, विशेष नगर विकास प्रकल्प (Special Township Project) व

औद्योगिक प्रयोजनासाठी बिगर सिंचन पाणी आरक्षणाच्या प्रस्तावांना मा. मंत्रीमंडळाची मान्यता आवश्यक राहिल.

३.० राष्ट्रीय ग्रामीण पेयजल योजना खेड ता.इगतपुरी, जि.नाशिक या संस्थेने खेड ल.पा. योजना मधून घरगुती वापरासाठी ०.१६३ दलघमी पाणी मागणी केली आहे. संदर्भाधीन शासन निर्णय क्र.३ च्या अनुषंगाने राष्ट्रीय ग्रामीण पेयजल योजना खेड ता.इगतपुरी, जि.नाशिक करिता खेड ल.पा.योजना मधून ०.१६३ दलघमी पाणी आरक्षण प्रस्तावास मंजुरी देण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय-**

४.० खालील तक्त्यातील रकाना क्र.२ मध्ये नमुद संस्थांना त्यांचे नावासमोर रकाना क्र.५ मध्ये नमूद पाणी आरक्षणास, परिच्छेद ५.० मधील अटींच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क् | पाणी आरक्षणाची मागणी करणाऱ्या संस्थेचे नांव | पाणी वापराचा प्रकार ( घरगुती) | जलाशय/ कालवा / नदीचे नांव | मंजूर केलेले पाणी आरक्षण (दलघमी) |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | राष्ट्रीय ग्रामीण पेयजल योजना खेड, ता.इगतपुरी, जि.नाशिक यांचा पाणी आरक्षण प्रस्ताव | घरगुती | खेड ल.पा.योजना | ०.१७८८ |

५.० उपरोक्त नमूद प्रस्तावास खालील अटींच्या अधीन राहून मान्यता देण्यात आली आहे.

१. शासन निर्णय क्र.संकीर्ण २०१३/(४१५/२०१३)/सिंव्य (धोरण), दि. १६/८/२०१४ नुसार ग्रामपंचायत या आर्थिक दृष्टया सक्षम नसल्याने त्यांच्याकडून पिण्याच्या पाणी आरक्षणापोटी सिंचन पुन:स्थापना खर्च घेण्यात येवू नये.

२. संस्थेकडून शासनाच्या प्रचलित घरगुती दराने आगाऊ पाणीपट्टी वसूल करावी.

३. प्रचलित शासन नियमाप्रमाणे पाणीपट्टी विहित वेळेत भरणे व जलमापन यंत्र (Water Meter) यंत्र बसविणे सदर ग्रामपंचायतीवर बंधनकारक राहील.

४. सर्वसाधारणपणे लघु पाटबंधारे प्रकल्पाचे नियोजन हे आठ महिन्यांकरीता असते. यामुळे उन्हाळयामध्ये अशा प्रकल्पाचे पाणी आटते. (अजिबात पाणी नसते.) त्यामुळे अपवादात्मक परिस्थितीत पाणी पुरवठा योजनांस इतर कोणताही पाणीस्त्रोत उपलब्ध नसल्यास त्यास मंजुरी देण्यात येते. तथापि, अशा मंजुरी दिलेल्या पाणीपुरवठा योजनेस उन्हाळयामध्ये पाणी मिळेलच याची शाश्वती देण्यात येत नाही. याकरीता आवश्यक तो साठा संस्थेने करणे गरजेचे आहे. संस्थेने कालवा आवर्तनाच्या वेळेसच

पाणीसाठा करणे आवश्यक राहिल. सदर पाणीपुरवठा योजनेकरिता उर्ध्व भागातील धरणातून वेगळयाने पाणी आवर्तन सोडण्यात येणार नाही.

५. आपत्कालीन परिस्थितीत तसेच दुष्काळग्रस्त परिस्थितीत पाण्या अभावी संस्थेस पाण्याची गरज भागविण्याकरिता कमीतकमी ६० दिवस पाणी पुरेल इतक्या क्षमतेचा साठवण तलाव स्वखर्चाने बांधावा. तसेच या कालावधीत पाणी उपलब्ध नसल्यास जलसंपदा विभागाची कोणतीही जबाबदारी राहणार नाही.

६. उध्दव ठिकाणी पाण्याची कमतरता असल्यास संस्थेस आरक्षित पाण्याची शाश्वती देता येणार नाही.

७. सांडपाण्यामुळे जलस्त्रोताचे अथवा नदयांचे प्रदूषण होणार नाही याची संबंधीत संस्थांनी दखल घेण्यात यावी. शा.नि.क्र.पापव २०१३/(प्र.क्र. ४६६/२०१३)/सिंव्य (महसूल) दि. १२/११/१३ मधील अटीचे पालन करणे पाणी वापरकर्त्यांना बंधनकारक राहिल.

८. संस्थेस प्रथम पाणी वापर करण्यास परवानगीचे इरादापत्र (लेटर ऑफ इंटेन्ट) देण्यात यावे व करारनामा करण्याकरीता ३ महिन्यांची मुदत ठेवावी. सदरहू करारनामा झाल्यानंतरच प्रत्यक्ष पाणी परवाना देण्यात यावा. संस्थेने सदर करारनामा विहित मुदतीत न केल्यास संस्थेचे पाणी आरक्षण आपोआप रद्द होईल.

९. बहुतेक पाणीपुरवठा योजनांना सुरु करण्यास आरंभ काळ (Gestation Period) लागतो. सर्वसाधारणपणे या कालावधीत संस्था करारनामा करण्यास टाळते अथवा संस्थेसोबत बिगरसिंचन करारनामा केला असला तरीही शासनास कोणतीही पाणीपट्टी प्राप्त होत नाही. तथापि, संस्थेने पाणी आरक्षण केलेले असल्यामुळे त्यांच्याकडून पाणीवापर होत नसूनही ते इतर अर्जदारांना सुध्दा देणे शक्य होत नाही. यामुळे शासनास मोठया महसूलास मुकावे लागते, ही बाब विचारात घेता, अशा पाणी आरक्षण प्रस्तावांस मान्यता देताना, महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण, मुंबई यांनी यांनी महाराष्ट्र राज्यासाठी ठोक पाणी प्रशुल्क निकष, भाग-३ मधील परिच्छेद १३.४ (पाच) मध्ये खाली नमूद केल्यानुसार कार्यवाही करण्यात येईल.

जलसंपदा विभागाशी करारनामा करताना बिगरसिंचन पाणीपारकर्ते अंतिम पाणी मागणी प्रमाणे टप्प्याटप्प्याने पाणीवापर करण्याचे नियोजन नमूद करु शकतील. अंतिम पाणी मागणी प्रमाणे पुरवठा सुरु होईपर्यंत वर्षनिहाय खालीलप्रमाणे आकारणी करण्यात येईल-

अ) टप्प्यानुसार ठरवून घेतलेल्या प्रमाणात पाणीवापर असल्यास लागू दराने आकारणी.

ब) टप्प्यानुसार ठरवून घेतलेल्या पाणीवापरापेक्षा + **१०** पाणीवापर (अधिक/कमी) झाल्यास, फरकाच्या वापरास दंडनीय दर लागू दराच्या **१.५** पट.

क) उर्वरित प्रमाणाकरिता म्हणजे अंतिम नियोजित पाणीवापर वजा टप्प्यानुसार नियोजित पाणी वापराकरिता, बांधिलकी / लेखबध्द आकार लागू दराच्या **५** टक्के वार्षिक प्रमाणे आकारण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१०२८१५४०३८९४२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjiv A Tatu

Digitally signed by Sanjiv A Tatu
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=SE and Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sanjiv A Tatu
Date: 2015.10.28 15:43:45 +05'30'

**(सं.अ. टाटू)**
शासनाचे उप सचिव

**प्रत,**

१. मा. राज्यपालांचे सचिव.
२. मा. मुख्यमंत्र्यांचे सचिव.
३. मा. अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई.
४. मा. सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन, मुंबई.
५. मा. विराधी पक्षनेते, विधानसभा, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई.
६. मा. विराधी पक्षनेते, विधानपरिषद, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई.
७. सर्व मा. मंत्री यांचे खाजगी सचिव.
८. सर्व मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
९. सचिव, महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण, मुंबई.
१० मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
११. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. प्रधान सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. सचिव (जसंव्य व लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. सर्व मुख्य अभियंता व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. सर्व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६. सर्व उपसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, उत्तर महाराष्ट्र प्रदेश, नाशिक
१८. अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाक्षेविप्रा,नाशिक
१९. निवडनस्ती कार्यासन सिंव्यधोरण.